**अनूसूचित जाती व नवबौध्द घटकातील मुलांच्या व मुलींच्या शासकीय निवासी शाळा मौजे अनवली ता.पंढरपूर जि.सोलापूर इमारत बांधकामाच्या अंदाजपत्रकास सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: सान्यावि-२०२१/प्र.क्र.११३/ बांधकामे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : ०४ मार्च, २०२२.

वाचा :-

१) शासन निर्णय, सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य व विशेष सहाय्य विभाग क्र.अजाशा-२००५/प्र.क्र.४३२/मावक-४, दि.१.६.२००६.
२) शासन निर्णय, सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य व विशेष सहाय्य विभाग क्र.बीसीएच-२००७/प्र.क्र.३०/मावक-४, दि.२४.३.२००७
३) आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय,पुणे यांचे पत्र क्र. सकआ/ बांधकामे/शानिशा / अनवली/सोलापूर/का-५अ/२१-२२/२४८२, दि.९.९.२०२१

प्रस्तावना :-

संदर्भ क्र.२ अन्वये अनूसूचित जाती व नवबौध्द घटकातील मुलांच्या व मुलींच्या शासकीय निवासी शाळा व वसतिगृह मौजे अनवली ता.पंढरपूर जि.सोलापूर येथील इमारत बांधकामास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली होती. आता संदर्भ क्र.३ अन्वये, आयुक्त, समाजकल्याण पुणे यांनी उपरोक्त निवासी शाळेचे सुधारीत अंदाजपत्रक सादर केले असून त्यास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय:-

अनुसूचित जाती व नवबौध्द घटकातील मुलांच्या व मुलींच्या शासकीय निवासी शाळा व वसतिगृह मौजे अनवली ता.पंढरपूर जि.सोलापूर येथील इमारत बांधकामाचे रू.१२,४७,७२,१६०/- (अक्षरी रूपये बारा कोटी बेचाळीस लक्ष बहात्तर हजार एकशे साठ फक्त) इतक्या रकमेचे सुधारीत अंदाजपत्रक प्रशासकीय मान्यतेस्तव आयुक्त समाजकल्याण आयुक्तालय, पुणे यांनी संदर्भ क्र.३ अन्वये सादर केले आहे. उपरोक्त प्रस्तावास वित्त विभाग शासन निर्णय दि.२०.९.२०१९ नुसार मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग,पुणे यांनी तांत्रिक मान्यता देण्यात आलेली आहे. सबब, सदरील प्रस्तावास पुढीलप्रमाणे परिगणीत केल्याप्रमाणे सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

गोषवारा

| व्याप्ती | मूळ प्रशासकीय मान्यता किंमत | सुधारीत प्रशासकीय मान्यता किंमत | अधिक्य | ठळक कारणे |
|---|---|---|---|---|
| **मुळ बाबी (अ+ब+क)** | ४,४२,११,८००.०० | १२,४७,७२,१६०.०० | ८,०५,६०,३५९.०० | मुळ नकाशात बदल प्र.मा. अंदाजपत्रक सन २००६-०७ च्या दरसुचीप्रमाणे असून सुधारीत अंदापत्रक सन २०२०-२१ च्या दरसूचीप्रमाणे करण्यात आले आहे. |
| **नवीन बाबी (अ+ब+क)** | | | | |
| **एकुण (अ+ब+क)** | ४,४२,११,८००.०० | १२,४७,७२,१६०.०० | ८,०५,६०,३५९.०० | |

**मुळ व सुधारीत प्रशासकीय मान्यतेचे सविस्तर तुलनात्मक विवरण**

| | व्याप्ती | मुळ किंमत | सुधारित किंमत | अधिक्य रक्कम | अधिक्याचे कारण अथवा बदलाबाबत प्राधिकरण संदर्भ |
|---|---|---|---|---|---|
| अ | **स्थापत्य(विद्युत व पाणीपुरवठा सोडून सर्व)** | | | | |
| | १.मुळ बाबी(आकस्मिक खर्चासह) | ३,६०,९०,४१८ | १०,७०,५५,५३६.४२ | ७,०९,६५,११८.४२ | १.मुळ प्रशासकीय मान्यतेमध्ये एकाच इमारतीमध्ये तळमजल्यावर मुलांचे वसतिगृह क्षेत्रफळ १४२६.८७ चौमी, पहिल्या मजल्यावर शाळा इमारत क्षेत्रफळ ११७१.४६ चौमी व दुसऱ्या मजल्यावर मुलींचे वसतिगृह क्षेत्रफळ ११७१.४६ चौमी असे गृहित धरण्यात आले होते तद्नंतर सुधारीत आराखडयानुसार मुख्य शाळा क्षेत्रफळ ८८७.८० चौमी, मुलांचे वसतीगृह तळ मजला ७७५.७७ चौमी व पहिला मजला ७७५.७७ चौमी तसेच मुलींचे वसतीगृह तळमजला ७७५.७७ चौमी व पहिला मजला ७७५.७७ चौमी असे असल्याने मुळ प्रशासकीय मान्यतेमध्ये क्षेत्रफळापेक्षा सुधारीत आराखडया मधील क्षेत्रफळामध्ये वाढ झाली आहे.<br>२.प्रशासकीय मान्यता सन २००६-०७ दरसुचीवर असून तांत्रिक मान्यता दरसुची सन २०१०-११ असल्यामुळे किमतीमध्ये वाढ झालेली आहे.<br>३.निविदा १७.८५ टक्के जादा दराने मंजूर झाल्यामुळे किमतीमध्ये वाढ झालेली आहे.उर्वरीत कामाचे अंदाजपत्रक सन २०२०-२१ च्या दरसुचीवर प्रस्तावीत आहे त्यामुळे किमतीत वाढ झालेली आहे. |
| | एकूण अ(१) | | | | |
| | २.नवीन बाबी | | | | |
| | एकूण अ(२) | | | | |
| | **एकुण अ** | **३,६०,९०,४१८.००** | **१०,७०,५५,५३६.४२** | **७,०९,६५,११८.४२** | |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| ब | **विद्युत** | | | | |
| | मुळ बाबी | ५३,२०,९०५.०० | ९१,२२,३८५.०० | ३८,०१,४८०.०० | |
| | एकूण ब(१) | | | | |
| | २. नवीन बाबी | | | | |
| | **एकूण ब(२)** | | | | |
| | **एकूण (ब)** | **५३,२०,९०५.००** | **९१,२२,३८५.००** | **३८,०१,४८०.००** | |
| क | **पाणीपुरवठा** | | | | |
| | १.मुळ बाबी | २८,००,४७७.०० | ८१,०१,०६६.५८ | ५२,९७,५९०.०० | |
| | **एकूण क(१)** | | | | |
| | **२.नवीन बाबी ०.५% विमा** | | ४,९३,१७०.०० | ४,९३,१७०.०० | |
| | एकुण क(२) | | | | |
| | **एकुण क** | **२८,००,४७७.००** | **८१,०१,०६६.५८** | **५७,९०,७६०.००** | |
| | **मुळ बाबी(अ+ब+क)** | **४,४२,११,८००.००** | **१२,४७,७२,१६०.००** | **८,०५,६०,३५९.००** | |
| | **नवीन** | | | | |
| | **एकुण (अ+ब+क)** | **४४२११८००.००** | **१२,४७,७२,१६०.००** | **८,०५,६०,३५९.००** | |

२. उपरोक्त विवरणपत्रात दर्शविल्याप्रमाणे रू.१२,४७,७२,१६०/-(अक्षरी रूपये बारा कोटी बेचाळीस लक्ष बहात्तर हजार एकशे साठ फक्त) इतक्या रकमेच्या सुधारित अंदाजपत्रकास खालील अटींच्या अधीन राहून प्रस्तुत शासन निर्णयान्वये सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

१) सदर काम सुधारित प्रशासकीय मान्यता दिलेल्या रकमेतच पूर्ण करणे अनिवार्य राहील.

२) तांत्रिक मान्यता देण्यापूर्वी अंदाजपत्रकास सक्षम प्राधिकाऱ्याचे साक्षांकन घेण्यात यावे.

३) मुळ प्रशासकीय मान्यता आदेशातील अटी व शर्तीचे काटेकोर पालन करण्यात यावे.

३. अनुसूचित जाती व नवबौध्द घटकातील मुलांच्या व मुलींच्या शासकीय निवासी शाळा व वसतिगृह मौजे अनवली ता.पंढरपूर जि.सोलापूर निवासी शाळा व वसतिगृह सुधारित अंदाजपत्रकास सक्षम प्राधिकाऱ्याची तांत्रिक मान्यता प्राप्त करून, विहित नियमानुसार अटी व शर्ती निश्चित करून ई-निविदा प्रसिध्द करण्याची कार्यवाही कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, सोलापूर यांनी तात्काळ करावी.

४. यावर होणारा खर्च मागणी क्र.एन-४, सार्वजनिक बांधकाम विभाग, मुख्य लेखाशीर्ष ४२२५- अनुसूचित जातीच्या व नवबौध्दांच्या मुलामुलींकरीता शासकीय निवासी शाळा बाधंणे (अ.जा.उ.यो.) (कार्यक्रम) ५३, मोठी बांधकामे लेखाशिर्ष ४२२५ ०५०५ या लेखाशीर्षाखाली खर्ची घालून तो सन २०२१-२२ या वित्तीय वर्षात करण्यात आलेल्या अर्थसंकल्पीय तरतूदीमधून भागविण्यात यावा. सदर

प्रकरणी आयुक्त, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रक तथा आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

५. हे ज्ञापन वित्त विभाग क्र.विअप-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम/भाग-२, दिनांक १७/४/२०१५ च्या शासन निर्णय व वित्त विभाग शासन निर्णय दि.२०/९/२०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये दिलेल्या अधिकारांच्या अधीन राहून निर्गमित करण्यात येत आहे.

६. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक सांकेतांक क्र. २०२२०३२५१४५१४८३१२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

ANIL KONDAJI AHIRE

Digitally signed by ANIL KONDAJI AHIRE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOCIAL JUCTICE AND SPECIAL ASSISTANCE DEPARTMENT, 2.5.4.20=9004dcdaa635070d60922aaa5dec8888d343a47356798e6c9cf27e4353d60e51, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=FD9B93035F4DA174C04FA71634FE1F6AA493C78A5335F985651F937888DF7A89, cn=ANIL KONDAJI AHIRE
Date: 2022.03.25 14:52:51 +05'30'

**( अनिल कों. आहिरे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) आयुक्त, समाजकल्याण, पुणे.
२) उपसचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग (इमारती-२), मंत्रालय, मुंबई-३२.
३) मुख्य अभियंता तथा समन्वयक, सार्वजनिक बांधकाम मंडळ, पुणे.
४) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे.
५) अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, सोलापूर
६) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ,सोलापूर
७) महालेखापाल महाराष्ट्र १/२ (लेखापरीक्षा/लेखाअनुज्ञेयता), मुंबई/नागपूर.
८) प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण विभाग,पुणे
९) सहायक आयुक्त, समाजकल्याण, पुणे/सोलापूर.
१०) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे/सोलापूर.
११) निवडनस्ती (बांधकामे).